कायम विसावा गृह, बिर्सी (२२३५ २८९६) या योजनेसाठी सन २०२२-२०२३ करीता निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. निधी-२०२२/ प्र.क्र.६६/ का-९**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- २३/०२/२०२३

**वाचा-**१) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३ दि.४ एप्रिल, २०२२
२) वित्त विभागाचे दि.५ एप्रिल, २०२२ रोजीचे अ.शा.पत्र.
३) शासन निर्णय क्र. निधी-२०२२/ प्र.क्र.६६/ का-९, दि. १२/०८/२०२२
४) शासन निर्णय क्र. निधी-२०२२/ प्र.क्र.६६/ का-९, दि. १७/११/२०२२

**प्रस्तावनाः-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत "कायम विसावा गृह, बिर्सी "या योजनेसाठी सन २०२२-२३ या अर्थसंकल्पीय वर्षात मागणी क्र. एक्स-१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १०४- वृध्द, विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण, (०१)(०३) कायम विसावा गृह, बिर्सी (२२३५-२८९६), या लेखाशीर्षाखाली ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टासाठी अर्थसंकल्पित निधी रु. २,००,०००/- (अक्षरी-रु. दोन लाख फक्त) व माहे डिसेंबर, २०२२ च्या हिवाळी अधिवेशनात मान्य झालेला पुरवणी मागणीचा निधी रु.५,७७,०००/- (अक्षरी-रु. पाच लाख सत्याहत्तर हजार फक्त) असा एकूण ७,७७,०००/- (अक्षरी रुपये सात लाख सत्याहत्तर हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित आहे. संदर्भाधीन क्र. ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये एकूण रु. ७०,०००/- निधी वितरीत करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या मान्यतेनुसार रु. ४,७३,०००/-(अक्षरी रु. चार लाख त्र्याहत्तर हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णयः-**

सदर शासन निर्णयान्वये महिला व बाल विकास विभागांतर्गत "कायम विसावा गृह, बिर्सी "या योजनेस सन २०२२-२३ या अर्थसंकल्पीय वर्षात मागणी क्र. एक्स-१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १०४- वृध्द, विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण, (०१)(०३) कायम विसावा गृह, बिर्सी (२२३५-२८९६), या लेखाशीर्षाखाली ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टासाठी रु. ४,७३,०००/- (अक्षरी रु. चार लाख त्र्याहत्तर हजार फक्त) इतका निधी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. वित्त विभागाच्या दि.४/४/२०२२ रोजीच्या शासन परिपत्रकाच्यासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. ९ मध्ये नमूद अटी/शर्तीची पुर्तता करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर निधी महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तीकेमध्ये उल्लेख केलेल्या अटी व शर्तीचे पालन करुन खर्च करण्यात यावा. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल व खर्च झालेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करण्यात येईल याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४४/व्यय-६, दिनांक १०/०२/२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०२२३१६३२५९०६३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KANCHAN SANJAY JAGTAP

Digitally signed by KANCHAN SANJAY JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e760047a41cc72cdc271a758371fb5ab8e76fb0330785d73b1c0a811b0bdc816, pseudonym=8EC62FF7C11C1384E0566606A515433297D6F6E3, serialNumber=AD0702347116FA2B3F1408C7E9F6C58F3D5B234C20164E9729E1607D00506B07, cn=KANCHAN SANJAY JAGTAP
Date: 2023.02.23 16:38:28 +05'30'

**( कांचन जगताप )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ /२, मुंबई / नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना तात्काळ वितरीत करण्यात यावा.
९. निवड नस्ती (का-९).